**भूमी अभिलेख विभागातील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.आस्था-१०१४/प्र.क्र.६६/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ जुलै, २०१५

वाचा : (१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१.०१.२०१४.
(२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.२०.०५.२०१४.
(३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/कार्या.१२, दि.१९.०१.२०१५
(४) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२ दि.२८/४/२०१५

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या निदेशांचे पालन करण्यासाठी शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भ अ.क्र.-१ वरील शासन निर्णयान्वये विविध नागरी सेवा मंडळे स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. सदर शासन निर्णयास संदर्भाधीन अनुक्रमांक-२ वरील शासन निर्णयान्वये स्थगिती देण्यात आली होती. आता, संदर्भाधीन अ.क्र.-३ वरील शासन निर्णयान्वये सदरहू स्थगिती देण्यात उठविण्यात आली आहे. त्यानुसार भूमि अभिलेख विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

१) उपसंचालक व जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख संवर्गातील अधिका-यांच्या पदस्थापना तसेच महाराष्ट्र शासकिय कर्मचा-यांच्या बदल्याचे विनियमन अधिनियम,२००५ मधील तरतूदीनुसार करावयाच्या त्यांच्या बदल्याबाबत सक्षम प्राधिका-यांना शिफारशी करण्यासाठी तसेच,

२) उप अधिक्षक भूमि अभिलेख संवर्गातील अधिका-यांच्या पदस्थापना तसेच महाराष्ट्र शासकिय कर्मचा-यांच्या बदल्याचे विनियमन अधिनियम,२००५ मधील कलम ४(४) व ४(५) तरतुदीनुसार करावयाच्या अनियकालीक व मुदतपुर्व बदल्या तसेच विभागबाहय संदर्भात आणि प्रतिनियुक्ती नियुक्तीसाठी सक्षम प्राधिका-यांना शिफारशी करण्यासाठी पुढीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (महसूल) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव/सचिव (वने) किंवा प्रधान सचिव/सचिव (मदत व पुर्नवसन) यापैकी सेवा जेष्ठ अधिकारी | सदस्य |
| ३ | जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे | सदस्य |
| ४ | सहसचिव/उप सचिव (ई-६ कार्यासन ) | सदस्य सचिव |

३. उप अधिक्षक भूमि अभिलेख संवर्गातील अधिका-यांच्या विभागातंर्गत नियतकालीक बदल्याबाबत सक्षम प्राधिका-यांना (जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख यांना) शिफारशी करण्यासाठी विभागीय स्तरावर स्वतंत्र नागरी सेवा मंडळ अस्तित्वात राहील.

४. गट-अ व गट-ब (राजपत्रित) पदांवर पदोन्नतीने / सरळसेवेने नियुक्तीसाठी संदर्भातील अ.क्र.४ येथे नमूद दिनांक २८/४/२०१५ च्या शासन अधिसूचनेतील सूचना व महाराष्ट्र शासकिय कर्मचा-यांच्या बदल्याचे विनियमन अधिनियम,२००५ मधील तरतूदीनुसार नागरी सेवा मंडळापुढे अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव विभागाकडून शिफारशींसह ठेवण्यात येईल.

५. बदल्यांबाबत शिफारशीसाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर ठेवताना, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार कार्यवाहीबाबतची वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्वभूमी / वस्तुस्थिती, नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणणे आवश्यक राहील.

६. पदस्थापनेच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर, शिफारशीनुसार प्रस्ताव प्रशासकीय विभागाने सक्षम प्राधिकाऱ्यास आणि प्रादेशिक विभागप्रमुखांनी विभागप्रमुख यांना मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय सक्षम प्राधिकाऱ्याकडून घेण्यात येईल.

७. हे आदेश तात्काळ अंमलात येत असून त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२३१२४८४०४३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Vitthal Veer
Date: 2015.07.23 12:59:32 +05'30'

**(डॉ.माधव वीर)**
उप सचिव

**प्रत,**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य,पुणे
२) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४०००३२
३) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४०००३२
४) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय मुंबई-४०० ०३२
५) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
६) सर्व उपसंचालक, भूमी अभिलेख प्रदेश, भूमि अभिलेख विभाग
७) निवडनस्ती ई-६